ग्रामसभेला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी याबाबत केलेल्या कार्यवाहीचा आढावा घेणे.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक - व्हिपीएम २०१०/प्र.क्र. १५६ / पंरा-३
मंत्रालय, मुंबई -४०००३२ दिनांक- ५ जुलै, २०१०.

संदर्भ -
१) शासन परिपत्रक क्र. व्हिपीएम २००९/प्र.क्र. १३७ / पंरा-३, दि. ४ जुलै, २००९
२) शासन परिपत्रक क्र. व्हिपीएम २००९/प्र.क्र. १३७ / पंरा-३ , दि. २ सप्टेंबर, २००९

परिपत्रक :-

७३ व्या घटनादुरुस्तीनुसार सत्तेचे विकेंद्रींकरण करण्यात येऊन पंचायत राज संस्थाना अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. तसेच भारतीय राज्य घटनेच्या कलम २४३ डी मध्ये ग्रामसभेची तरतूद करण्यात आली आहे. यामुळे पंचायत राज व्यवस्थेत ग्रामसभेला व्यापक अधिकार प्राप्त होऊन अनन्य साधारण महत्व प्राप्त झाले आहे. ग्रामसभा हा लोकशाही व्यवस्थेच्या विकेंद्रीकरणाचा मुलभूत पाया आहे. ग्रामसभेमुळे ग्रामपंचायतीचे प्रशासन अधिक जबाबदार व पारदर्शक होण्यास मदत झाली आहे.

२. ग्रामसभा या पंचायत राज संस्थेमधील महत्वाचे अंग असल्याने ग्रामसभांचे बळकटीकरण करण्याची आवश्यकता लक्षात घेऊन महाराष्ट्र शासनाने मुंबई ग्राम पंचायत अधिनियम १९५८ मध्ये सुधारणा करुन विविध तरतूदी केल्या आहेत.

३. शासनाने मुंबई ग्रामपंचायत अधिनियम १९५८ मधील तरतूदी अन्वये वर्षातून किमान सहा ग्रामसभा घेणे बंधनकारक केले आहे. तसेच सदर ग्रामसभा घेण्यास कुचराई केल्यास सरपंच, यथास्थिती उपसरपंच, ग्रामसेवक यांचेविरुध्द कारवाई करण्याची तरतूदही करण्यात आलेली आहे.

४. तथापि, ग्रामसभा वेळेवर होतात किंवा नाही, ग्रामसभेचे कामकाज नियमानुसार होते किंवा नाही हे वेळोवेळी यासंदर्भातील आढावा घेऊन तपासण्याची आवश्यकता आहे. ही बाब लक्षात घेऊन

ग्रामसभा संदर्भात मुंबई ग्रामपंचायत अधिनियम १९५८ मध्ये करण्यात आलेल्या तरतूदींची परिणामकारक अंमलबजावणी करण्याच्या हेतूने तालुका, जिल्हा व विभागीय स्तरावर अनुक्रमे गट विकास अधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी व विभागीय आयुक्त यांच्या अध्यक्षतेखाली होणा-या मासिक सभांमध्ये याचा आढावा खालीलप्रमाणे घेण्याच्या सूचना शासन समक्रमाकाच्या दि. ४ जुलै, २००९ च्या परिपत्रकाव्दारे दिल्या आहेत. सदर परिपत्रकाची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

| अ.क्र. | आढावा स्तर | प्राधिकारी | कालमर्यादा | कार्यकक्षा |
|---|---|---|---|---|
| १ | विभागीय स्तर | विभागीय आयुक्त | दर तीन महिन्यांनी | जिल्हा परिषद निहाय ग्रामसभांचा आढावा घेणे. |
| २ | जिल्हास्तर | मुख्य कार्यकारी अधिकारी जि.प. | दर दोन महिन्यांनी | पंचायत समिती निहाय ग्रामसभांचा आढावा घेणे |
| ३ | तालुकास्तर | गट विकास अधिकारी | प्रत्येक महिन्याला | ग्रामसेवकाने ग्रामसभेबाबत केलेल्या कार्यवाहीचा आढावा घेणे. |

५. तसेच दिनांक २ सप्टेंबर, २००९ च्या परिपत्रकान्वये सर्व विभागीय आयुक्त , मुख्य कार्यकारी अधिकारी व गट विकास अधिकारी यांना सूचित करण्यात आलेले आहे की, ग्रामसभेसंदर्भात मुंबई ग्राम पंचायत अधिनियम १९५८ मध्ये करण्यात आलेल्या तरतूदींचे आणि शासन समक्रमाकाच्या दि.४ जुलै, २००९ च्या परिपत्रकातील सूचनाचे पालन न केल्यास संबधित शासकीय कर्मचारी/अधिकारी यांच्यावर "शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्याचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी तरतूद करण्याकरिता अधिनियम" (दप्तर दिरंगाई कायदा) मधील कलम १० च्या पोट कलम १, २ व ३ प्रमाणे कारवाई करण्यात यावी. सदर परिपत्रकातील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

६. ग्रामसभा वेळेवर होतात किंवा नाही तसेच ग्रामसभेत घेण्यात येणा-या विषयासंदर्भात सोबत जोडलेल्या प्रपत्र "अ" प्रमाणे ग्रामपंचायतीकडून गट विकास अधिकारी यांनी अहवाल प्राप्त करुन घ्यावा. सदर अहवाल गट विकास अधिकारी यांच्याकडे जमा करण्याची जवाबदारी ही जिल्हा परिषदेने नेमलेल्या निरीक्षक व ग्रामसेवक/ग्राम विकास अधिकारी यांची असेल.

७. गट विकास अधिकारी यांनी प्रपत्र "अ" प्रमाणे सर्व ग्राम पंचायतीकडुन ग्राम सभेबाबत अहवाल प्राप्त करुन घेतल्यानंतर, तालुक्यातील ग्राम सभांचा एकत्रित अहवाल प्रपत्र "ब" प्रमाणे

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सादर करावा. सदर कार्यवाही ग्राम सभा झाल्यानंतर १५ दिवसाच्या आत पूर्ण करावी.

८. तसेच ग्राम सभेसंदर्भात ग्रामस्थ / निरीक्षक / विस्तार अधिकारी / प्रसार माध्यम वगैरे मार्फत पंचायत समितीकडे आलेल्या तक्रारीसंदर्भात केलेल्या कार्यवाहीचा अहवाल दरमहा गट विकास अधिकारी यांनी **प्रपत्र "क"** प्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सादर करावा.

९. जिल्हयातील प्रत्येक ग्राम पंचायतीमध्ये अधिनियमातील तरतूदी नुसार ग्रामसभा होणे आवश्यक आहे व याबाबतची खबरदारी घेण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी यांची आहे. यास्तव मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सोबत जोडलेल्या **प्रपत्र "ड"** प्रमाणे वेळापत्रक आखून जिल्हयातील ग्रामसभांच्या प्रसिध्दीचे तसेच निरीक्षक नियुक्तीचे, त्यांच्या पूर्व भेटींचे व गट विकास अधिकारी यांनी अहवाल सादर करण्याचे नियोजन करावे.

१०. सन २००९-१० या ग्रामसभा वर्षानिमित्ताने ग्रामसभा बळकटीकरणाच्या दृष्टीकोनातून शासनाने सर्व ग्रामपंचायतीमध्ये अधिनियमातील तरतूदीनुसार ग्रामसभा होण्याच्या दृष्टीने धोरणे निश्चित केलेली आहेत. त्यानुसार वरील सुचनांचे काटेकोरपणे पालन करुन विभागीय आयुक्त, मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद व गट विकास अधिकारी यांनी तात्काळ कार्यवाही करावी.

११. सदर शासन परिपत्रक हे महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००७०७१८३७४५००१ हा आहे.

( डॉ.मल्लीनाथ कलशेट्टी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) सर्व विभागीय आयुक्त
२) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
३) सर्व गट विकास अधिकारी
४) निवडनस्ती का.क्र. पंरा-३

H-1400-2

## प्रपत्र "अ"

### ग्रामसभेचा अहवाल

१. ग्रामपंचायत - ____________, तालुका - ____________ व जिल्हा ____________

२. ग्रामसभा घेण्यासाठी ग्रामपंचायतीने काढलेल्या सूचनेचा क्रमांक व दिनांक -____________

३. ग्रामसभेची तारीख व वेळ - ____________

४. ग्रामसभेचे अध्यक्ष - ____________

५. ग्रामसभेच्या उपस्थितीची माहिती -

| मतदार संख्या | | | ग्रामसभेस उपस्थित संख्या | | | चर्चेत भाग घेतलेली संख्या | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| पुरुष | स्त्रिया | एकूण | पुरुष | स्त्रिया | एकूण | पुरुष | स्त्रिया | एकूण |
| | | | | | | | | |

६. ग्रामसभेपुढील कामकाज -

| ग्रामसभेपुढे मूळ विषय पत्रिकेनुसार ठेवलेल्या विषयांची संख्या | वॉर्ड सभेकडून शिफारस झालेले व ग्रामसभेपुढे ठेवण्यात आलेले विषयांची संख्या | महिला सभेकडून शिफारस झालेले व ग्रामसभेपुढे ठेवण्यात आलेले विषयांची संख्या | ऐनवेळचे विषयांची संख्या | एकूण चर्चेत घेतल्या गेलेल्या विषयांची संख्या | निर्णयांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | | | | |

७. ग्रामसभेस उपस्थित असलेल्या निरीक्षकाचे नाव - ____________

७ अ. व्हिडीओ रेकॉर्डींग केले असलेले - होय/ नाही.

८. ग्रामसभेस उपस्थित असलेल्या जि.प./पं.स. पदाधिकारी व अधिकारी यांचे नाव - ____________

९.(अ) ग्रामसभेस उपस्थित असलेल्या गाव पातळीवरील शासकीय / निमशासकीय कर्मचारी व अधिकारी यांचे नाव व पदनाम - ____________

(ब) ग्रामसभेने ग्रामपंचायत कायदा कलम ७ (६) नुसार अहवाल गटविकास अधिका-यांकडे दिलेल्या कर्मचा-याचे नावे व पदनाम

१०. ग्रामसभेने घेतलेले महत्वाचे निर्णय -

| अ.क्र. | विषय | निर्णय | अंमलबजावणी केली असल्यास |
|---|---|---|---|
| | | | |
| | | | |

स्वाक्षरी:-

ग्रामसेवक ग्रामसभेचे अध्यक्ष सरपंच

ध-१४००-१५००-०२-०1०1 २

## प्रपत्र "ब"

### गटविकास अधिकारी यांनी पंचायत समितीतील ग्रामसभांचा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सादर करावयाच्या अहवालाचा नमुना

| ग्राम पंचायत संख्या | ग्रामसभेपूर्वी वॉर्ड सभा घेतलेल्या ग्राम पंचायतींची संख्या | ग्रामसभेपूर्वी महिला ग्राम सभा घेतलेल्या ग्राम पंचायतीची संख्या | ग्रामसभा घेण्यात आलेल्या ग्राम पंचायतीची संख्या | निरीक्षक उपस्थित असलेल्या ग्रामसभेच्या ग्राम पंचायतींची संख्या | कोरम अभावी तहकुब करण्यात आलेल्या ग्राम पंचायतींची संख्या | कोरम अभावी तहकूब ग्रामसभा पून्हा संपन्न झालेल्या ग्राम पंचायतींची संख्या | व्हिडीओ रेकॉर्डीग केलेल्या ग्राम सभांची संख्या | गटविकास अधिका-यांनी ग्राम पंचायत कायदा कलम ७(७)नुसार केलेल्याकार्यावाहीची संख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| | | | | | | | | |

म-१५०० - ३'भ

## प्रपत्र "क"

## ग्रामसभेच्या तक्रारी संदर्भात गट विकास अधिकारी यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद यांना सादर करावयाच्या अहवालाचा नमुना

| ग्रामसभे संदर्भात प्राप्त झालेल्या तक्रारीची संख्या (ग्राम पंचायत कायदा कलम ७(७)सह) | निरीक्षक / वि.अ./ प्रसार माध्यम मार्फत पंचायत समितीकडे प्राप्त झालेल्या तक्रारीची संख्या | ग्रामसभा न झाल्याबाबत प्राप्त तक्रारींची संख्या | चौकशी करण्यात आलेल्या तक्रारअर्जांची संख्या | त्यावर उचित कार्यवाही करुन निकाली काढण्यात आलेल्या तक्रारीची संख्या |
|---|---|---|---|---|
| | | | | |

H-1400-5

## प्रपत्र "ड"

## ग्रामसभा वेळेवर होण्यासाठी करावयाच्या पूर्वतयारीचे तसेच अहवाल पाठविण्याचे वेळापत्रक

| अ. क्र. | ग्रामसभा वेळापत्रक | जिल्हा, तालुका व ग्रामपंचायत स्तरावर पूर्वतयारी | निरीक्षकाने ग्राम सभेपूर्वी ग्रामपंचायतीला दयावयाच्या पूर्व भेटीचे वेळापत्रक | ग्रामसभेनंतर गटविकास अधिकारी यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी यांना सादर करावयाच्या अहवालाचे वेळापत्रक |
|---|---|---|---|---|
| १ | दि. २६ जानेवारी | दि.१ जानेवारी पासुन | दि. १८-२१ जानेवारी | दि. १० फेब्रुवारी |
| २ | दि. १ मार्च ते दि.८ मार्च | दि. १५ फेब्रुवारी पासुन | दि. २४-२५ फेब्रुवारी | दि. २० मार्च |
| ३ | दि.२४ एप्रिल ते दि. १ मे | दि. १ एप्रिल पासुन | दि. १६-१९ एप्रिल | दि. १५ मे |
| ४ | दि. ९ ते दि.१५ ऑगस्ट | दि. १ ऑगस्ट पासुन | दि. १-४ ऑगस्ट | दि.३० ऑगस्ट |
| ५ | दि. २ ऑक्टोबर | दि. १५ सप्टेंबर पासुन | दि. २४-२७ सप्टेंबर | दि. १७ ऑक्टोबर |
| ६ | दि.१९ ते दि.२६ नोव्हेंबर | दि. १ नोव्हेंबर पासुन | दि. ११-१४ नोव्हेंबर | दि. १५ डिसेंबर |

टिप:-

१. ग्रामसभांच्या वरील तारखा तसेच वेळापत्रक मार्गदर्शक स्वरुपात आहेत, याची नोंद घ्यावी.

२. नियोजीत ग्रामसभेपूर्वी जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावरुन ग्रामसभेच्या प्रचारा संदर्भात जोरदार प्रसिध्दी होणे आवश्यक आहे.

३. प्रत्येक ग्रामपंचायतीच्या ग्रामसभेसाठी नेमलेल्या निरीक्षकाने संबंधीत ग्रामपंचायतीने ग्रामसभेसाठी केलेल्या पूर्वतयारीची पहाणी करण्यासाठी नियोजीत ग्रामसभेच्या दिनांकापूर्वी सदर ग्रामपंचायतीला किमान ७ दिवस अगोदर भेट देणे आवश्यक आहे व सदर ग्रामपंचायतीकडुन अधिनियम व नियमातील तरतुदी नुसार सदर ग्रामसभेचे नियोजन करुन घेणे आवश्यक आहे.

H-1400-425